सर्व वजातदार अधिकाऱ्यांनी करपात्र वस्तु / सेवा अथवा दोन्हीसाठी पुरवठादाराला करावयाच्या प्रदानाच्या वेळी पुरवठादाराचा पॅनकार्ड क्रमांक वस्तु व सेवा कर कायद्याखालील त्याचा नोंदणी क्रमांक राज्य एकात्मिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (State Integrated Financial Management System) मध्ये समाविष्ट करणेबाबत.......

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०१८/प्र.क्र.१४४/२०१८/कोषा प्रशा-५**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ९ ऑगस्ट, २०२४

**वाचा** : १. केंद्र शासन, वित्त मंत्रालय, सेंट्रल बोर्ड ऑफ इनडायरेक्ट टॅक्सेस आणि कस्टमस यांचे अधिनियम क्रमांक ५०/२०१८- सेंट्रल टॅक्स, दिनांक १३ सप्टेंबर २०१८.

२. महाराष्ट्र वस्तू व सेवा कर कायद्याअंतर्गत अधिसुचना क्र.५०/२०१८, राज्यकर दि.१८ सप्टेंबर, २०१८.

३. शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०१८/प्र.क्र.१४४/२०१८/कोषा प्रशा-५, दिनांक : २८ सप्टेंबर, २०१८.

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र वस्तू व सेवा कर अधिनियम, २०१७ व केंद्रीय वस्तू व सेवा कर अधिनियम, २०१७ च्या कलम-५१ मध्ये वस्तु किंवा सेवा अथवा दोन्ही यांच्यावर मुळ स्त्रोतातून कर वजात करण्याची (TDS) तरतूद करण्यात आली आहे. केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि. १३ सप्टेंबर, २०१८ व महाराष्ट्र शासनाच्या दि.१८ सप्टेंबर, २०१८ च्या अधिसुचनेनुसार उपरोक्त कलम-५१ मधील तरतुदींची अंमलबजावणी दिनांक ०१ ऑक्टोबर २०१८ पासून करण्यात आलेली आहे.

महाराष्ट्र वस्तू व सेवा कर अधिनियम, २०१७ व केंद्रीय वस्तू व सेवा कर अधिनियम, २०१७ च्या कलम-५१ नुसार केंद्र व राज्य शासन, स्थानिक स्वराज्य संस्था किंवा शासकिय अभिकरणांच्या आस्थापनांना (जसे की; सर्व आहरण व संवितरण अधिकारी, कोषागार / उपकोषागार अधिकारी, अधिदान वा लेखा अधिकारी, सर्व सार्वजनिक उपक्रम, महामंडळे, नियामक प्राधिकरणे, स्थानिक प्राधिकरणे व अधिकरणे, सर्व महानगरपालिका, नगरपरिषदा, नगरपंचायती, छावणी मंडळे, जिल्हा परिषदा, पंचायत समित्या आणि ग्रामपंचायती इ.) यांना **वजातदार (TDS Deductor)** घोषित करण्यात आलेले असून त्यांना वस्तू आणि सेवा अथवा दोन्ही पुरविणाऱ्या संस्थांना **वजाती (Deductee)** घोषित करण्यात आलेले आहे.

उपरोक्त कार्यालयाच्या स्तरावर **वजातदार (Deductor)** या नात्याने वजातदारांनी, वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हींचा करपात्र पुरवठा अंर्तभूत असलेल्या रु. २,५०,०००/- वरील कंत्राटाच्या देयकासंदर्भात २% कर (TDS) वजावट करावयाची आहे. त्यास अनुसरुन सर्व वजातदारांना या परिपत्रकान्वये खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात येत आहेत.

**वजातदार अधिकारी (TDS Deductor) यांनी करावयाची कार्यवाही :-**

१) सर्व वजातदार आस्थापनांनी, करपात्र वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हीबाबतच्या देयकांमधून २% TDS वजावट करण्यासाठी वस्तू व सेवा कर कायदा २०१७ अंतर्गत स्वत:ची नोंदणी करणे बंधनकारक आहे. तसेच अशा वस्तू व सेवा कर नोंदणीधारक वजातदार अधिकाऱ्याने महाराष्ट्र वस्तू व सेवा कर अधिनियम, २०१७ च्या तरतुदीनुसार कर कपातीचा भरणा व विवरणपत्रे विहित मुदतीत दाखल करणे अनिवार्य आहे.

२) सर्व वजातदार आस्थापनांनी, पुरवठादार करदात्यांचा GSTIN क्रमांक आणि PAN क्रमांक त्यांच्या अदाता (Payee) नोंदणी प्रणालीमध्ये तात्काळ समावेश करणे अनिवार्य आहे, जर पुरवठादार/कंत्राटदार वस्तू व सेवा कर कायद्याखालील नोंदणीकृत नसेल तर त्याचा PAN क्रमांक अदाता (Payee) नोंदणी प्रणालीमध्ये समावेश करणे आवश्यक राहील.

३) सर्व वजातदार आस्थापनांनी, पुरवठादार करदात्याने पुरविलेल्या GSTIN क्रमांकांची खातरजमा www.gst.gov.in या पोर्टलवर Search Taxpayer या मुख्य पर्यायाअंतर्गत Search by GSTIN येथे करावी.

४) सर्व वजातदार आस्थापनांनी, प्रत्येक व्यवहारासाठी वस्तू आणि सेवा पुरवठादारांचा GSTIN क्रमांक आणि PAN क्रमांक लेखा व देयके प्रणालीमध्ये अचूकपणे नोंदवला गेला आहे हे सुनिश्चित करावे.

५) सर्व वजातदार आस्थापनांनी, पुरवठादार / कंत्राटदार यांना देय असलेल्या रकमेबाबतची देयके तयार करताना देय असलेल्या एकूण रकमेमधुन २% GST TDS वजावट करण्याची दक्षता घ्यावी. २% TDS वजावट करण्यासाठी देण्यात आलेल्या लेखाशिर्षासमोर स्पष्टपणे रक्कम नमूद करणे आवश्यक राहील.

६) वस्तू किंवा सेवा अथवा दोन्ही यांच्या पुरवठ्यासाठी करावयाच्या प्रदानावेळी जर सदरहू पुरवठ्याची संविदा करपात्र वस्तू किंवा सेवा अथवा दोन्हीच्या संदर्भात असेल व त्या संविदेचे मुल्य रु.२,५०,०००/- रकमेच्या वर असल्यास, अशी वजावट करणे बंधनकारक आहे.

७) २% TDS वजावट करावयाच्या कार्यवाहीसाठी तपशीलवार माहितीसाठी राज्य कर आयुक्त, वस्तू व सेवा कर यांचे परिपत्रक क्रमांक २७ टी, दिनांक ०७/०७/२०१७ व अंतर्गत परिपत्रक क्र. २६ जे दि. १९/०९/२०१८ चे अवलोकन करावे.

८) वस्तू व सेवा किंवा वस्तू आणि सेवांचा पुरवठादार (Supplier) आणि वस्तू व सेवा किंवा वस्तू आणि सेवांचा प्राप्तकर्ता (Recipient) असे दोघेही महाराष्ट्रात स्थित असल्यास महाराष्ट्र वस्तू व सेवा कर अधिनियम, २०१७ व केंद्रीय वस्तू व सेवा कर अधिनियम, २०१७ चे कलम -५१ नुसार अदात्यास देय प्रदानावर प्रत्येकी १% TDS असा एकूण २% TDS वसूल करणे बंधनकारक आहे.

तथापि, जर वस्तू अथवा सेवा कर प्राप्तकर्त्याचे व्यवसायाचे ठिकाण (POB) महाराष्ट्रामध्ये नोंदणीकृत असेल आणि वस्तू अथवा सेवांच्या पुरवठयाचे ठिकाण (Place of Supply) महाराष्ट्रामध्ये असेल परंतु वस्तु अथवा सेवांच्या पुरवठादाराचे ठिकाण (Location of Supplier) हे इतर राज्य अथवा केंद्रशासित प्रदेशामध्ये नोंदणीकृत असेल तर, संबंधीत वस्तु अथवा सेवेचा पुरवठा हा आंतरराज्यीय पुरवठा असेल आणि अशा प्रकरणी वजातदाराने (Deductor) २% TDS हा एकात्मिक वस्तू अथवा सेवा कर (IGST) म्हणून कापुन देणे आवश्यक आहे.

९) सर्व वजातदार आस्थापनांनी, अशा प्राप्त झालेल्या वजावटीच्या रकमा पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत भारतीय रिझर्व्ह बँक यांचेकडे जमा करणे कायद्याने बंधनकारक आहे.

१०) सर्व वजातदार आस्थापनांनी **वजातदार (Deductor)** या नात्याने, भारतीय रिझर्व्ह बँकेत ज्या महिन्यामध्ये अशी रक्कम वजावट करुन जमा करतील, त्या पुढील महिन्याच्या १० दिवसांचे आत त्यांनी Form GSTR-7 (वजातदाराने भरावयाचे विवरणपत्र) या विहित नमुन्यामध्ये विवरणपत्र (Return) सादर करणे बंधनकारक आहे.

११) वजातदारांनी भरावयाचे मासिक विवरणपत्र नमुना क्रमांक GSTR-7 विहित मुदतीत न भरल्यामुळे महाराष्ट्र वस्तू व सेवाकर अधिनियम २०१७ नुसार भरावे लागणारे विलंब शुल्क आणि अकारली जाणारी शास्तीची रक्कम भरण्याची जबाबदारी संबंधीत वजातदार यांची व्यक्तीशः राहील.

१२) सर्व वजातदार आस्थापनांना या शासन परिपत्रकाद्वारे निर्देश देण्यात येत आहेत की, त्यांनी वस्तू व सेवा किंवा वस्तू आणि सेवांचा पुरवठा करणाऱ्या पुरवठादारांच्या देयकांसंदर्भातील माहिती खाली दिलेल्या तक्त्यामध्ये नियमितपणे जतन करावी व महाराष्ट्र वस्तू व सेवा कर विभागास आवश्यकतेनुसार उपलब्ध करून द्यावी.

| Payer Government Department Name | PAN / TAN of Payer | DDO code of Payer | DDO Designation / Name | Address of the Payer | Name of the Contractor /Supplier | Address of the Contractor / Supplier (where GSTIN is not available) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |

| PAN / TAN of the Contractor/ Supplier | GSTIN of the Contractor / Supplier | Date of Payment | Bill / token No of the Treasury | Amount paid to Contractor /Supplier | Amount of TDS |
|---|---|---|---|---|---|
| ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ |

तरी सर्व वजातदार आस्थापनांनी दि.१ सप्टेंबर, २०२४ पासून या शासन परिपत्रकात नमुद उपरोक्त कार्यवाही सुरु करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०८०९१८१५०५३७०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR

Digitally signed by DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=b8e8c3a034acb70f16af6f81c69ca038ff6f25ff78cfc9e6d815fd95b5367b07, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=37A42E182BACE4C129ABBEB54E27836D32D401560638F644A547867205474EE5, cn=DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR
Date: 2024.08.09 18:30:31 +05'30'

**( डॉ.राजेंद्र गाडेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४. सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
६. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७. मा.मुख्य सचिव यांचे सचिव
८. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
९. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
११. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१२. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१४. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१५. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन*, नागपूर ४४४००१
१६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१८. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१९. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
२०. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२१. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२२. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२३. सर्व विभागीय आयुक्त
२४. सर्व जिल्हाधिकारी

२५. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२६. संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२८. सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/ नाशिक /छत्रपती संभाजीनगर/ अमरावती /नागपूर
२९. संचालक ,स्थानिक निधी लेखापरिक्षा संचालनालय, नवी मुंबई
३०. सहसंचालक,स्थानिक निधी लेखा मुंबई / पुणे/ नाशिक/ छत्रपती संभाजीनगर / अमरावती/नागपूर
३१. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
३२. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३३. निवड नस्ती कोषा प्र.५